**दि चिल्ड्रेन्स एड सोसायटी, मुंबई संदर्भातील विषय आयुक्त, एकात्मिक बाल विकास योजना, नवी मुंबई यांच्याकडे हस्तांतरित करणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: चिएसो-२०१७/प्र.क्र. ११४/कार्या-८**
नवीन प्रशासकीय इमारत, तिसरा मजला,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- ०६ जुलै, २०१७.

**संदर्भ :-** १) शासन आदेश- क्रमांक-पीआयएल-२०१४/प्र.क्र.१५३/का-८, दिनांक २० ऑगस्ट, २०१४
२) शासनाचे क्रमांक- मबाआ-२०१५/प्र.क्र.१०१/का-७, दिनांक २५/६/२०१५ चे पत्र.
३) शासनाचे क्रमांक- मबाआ-२०१५/प्र.क्र.१०१/का-७, दिनांक ३०/७/२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त विषयाच्या संदर्भाधिन-३ च्या पत्रान्वये मुख्याधिकारी, दि चिल्ड्रेन्स एड सोसायटी, मुंबई या पदाचा अतिरीक्त कार्यभार श्री. बापूराव भवाने, बालविकास प्रकल्प अधिकारी, (नागरी) , धारावी, यांच्याकडे सोपविण्यात आला आहे.

२. दि चिल्ड्रेन्स एड सोसायटी, मुंबई हा विषय मुख्यत: बालगृहांशी संबंधीत असल्याने आतापर्यंत सदरचा विषय हा आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचे अधिनस्त दर्शविण्यात आलेला आहे. तथापि या सोसायटीच्या अखत्यारितील जागा व अन्य अडचणींच्या अनुषंगाने विविध संस्थांना सातत्याने भेटी देणे, संस्थेच्या प्रस्तावित विकासाच्या अनुषंगाने संबंधित इतर प्राधिकरणांशी संपर्क ठेवून वेळोवेळी बैठकांसाठी उपस्थित राहणे या सर्व बाबींचा निपटारा आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्याकडून त्यांचे कार्यालय पुणे येथे असल्यामुळे तसेच कार्य बाहुल्यामुळे विहीत मुदतीत होणे व संपूर्णत: संनियंत्रण करणे शक्य होत नव्हते. ही बाब लक्षात घेता, सदर विषय हा आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचेकडे वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वरील पार्श्वभूमीवर या शासन निर्णयान्वये दि चिल्ड्रेन्स एड सोसायटी, मुंबई संदर्भातील सर्व बाबी यापुढे आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचेकडे वर्ग करण्यात येत आहे. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई हे या संस्थेच्या दैनंदिन कामकाज, अडी-अडचणी इत्यादी संदर्भात मुख्याधिकारी, दि चिल्ड्रेन्स एड सोसायटी यांना मार्गदर्शन करतील.

२. यासंदर्भात आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी खालील बाबींची दक्षता घ्यावी.

अ) संस्थेच्या मोक्याच्या ठिकाणी असलेल्या जागांवरील अतिक्रमण व त्यावर करावयाच्या उपाययोजनांसंदर्भात तातडीने कार्यवाही करून वेळोवेळी शासनास अवगत करावे.

ब) सोसायटीच्या अन्य अडचणींच्या अनुषंगाने विविध संस्थांना सातत्याने भेटी देवून संस्थेच्या प्रशासकीय व आर्थिक विकासाच्या अनुषंगाने तसेच न्यायालयीन सर्व बाबींचा वेळेत निपटारा करावा.

क) विविध न्यायालयीन प्रकरणांची सद्य:स्थिती जाणून घेऊन त्याबाबतची आवश्यक कार्यवाही विहीत मुदतीत व तातडीने करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७०६११२६४९५२३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2017.07.06 16:38:20 +05'30'

**( स्मिता निवतकर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.मंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२.
२) मा.राज्यमंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. सचिव,महिला व बाल विकास यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,मुंबई-३२.
४) आयुक्त,महिला व बाल विकास, पुणे.
५) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
६) सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास,
७) मुख्याधिकारी, दि चिल्ड्रेन्स एड सोसायटी, मुंबई
८) जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर जिल्हा.
९) निवडनस्ती (कार्यासन-८), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय.